महात्मा जोतिराव फुले शेतकरी
कर्जमुक्ती योजना २०१९

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,**
**शासन पूरकपत्र क्र. कृकमा १२१९/ प्र.क्र.१५७/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७/२-स, दि.२७.१२.२०१९

**शासन पूरकपत्र :-**

दि.१.४.२०१५ ते दि. ३१.३.२०१९ पर्यंतच्या कालावधीसाठी अल्पमुदतीचे पीक कर्ज घेतलेल्या, तसेच, या कालावधीत घेतलेल्या अल्पमुदतीच्या पीक कर्जाचे पुनर्गठन / फेरपुनर्गठन केलेल्या कर्जामधील दि.३०.९.२०१९ रोजी रु.२.०० लाखापर्यंत थकीत व परतफेड न झालेली रक्कम असलेल्या थकबाकीदार शेतक-यांना दिलासा देण्यासाठी “महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” या कर्जमुक्ती योजनेचा निर्णय दि.२४.१२.२०१९ च्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार दि.२७.१२.२०१९ रोजी योजनेचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णयातील “शासन निर्णय" या मथळयाखालील परिच्छेद (III) मधील *“अ.क्र.६) कृषि उत्पन्न बाजार समिती, सहकारी साखर कारखाना, सहकारी सुतगिरणी, नागरी सहकारी बँका, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व सहकारी दूध संघ यांचे अधिकारी (एकत्रित मासिक वेतन रुपये २५००० पेक्षा जास्त असणारे) व पदाधिकारी (अध्यक्ष, उपाध्यक्ष व संचालक मंडळ)”* नंतर खालील मजकूर अंतर्भूत करण्यात येत आहे.

**“वरील अपात्रतेच्या वर्गवारीतील समाविष्ट व्यक्तींची माहिती ज्या विविध विभाग/ कार्यालय/ महामंडळ यांच्या अखत्यारीत आहे, त्यांच्याकडून अशा वर्गवारीतील व्यक्तींच्या आधार क्रमांकाच्या प्राप्ततेच्या व त्याच्या अचूकतेच्या अधिन राहून बँकांकडून प्रलंबित कर्जखात्याबद्दल गोळा होणा-या माहितीचे संस्करण करण्यात येईल. तसेच अपात्रतेच्या वर्गवारीतील समाविष्ट व्यक्तींनी योजनेचा लाभ घेऊ नये याबाबत जाहीर आवाहन करण्यात येईल.”**

सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००२१०१५५९२९२४०२ असा आहे. हे शासन पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.02.10 16:02:16 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, वित्त व सहकार यांचे खाजगी सचिव

३) मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य (सर्व)
४) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५) मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
७) मुख्य महाप्रबंधक, भारतीय रिझर्व्ह बँक, केंद्रीय कार्यालय, मुंबई
८) मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड प्रादेशिक कार्यालय, पुणे
९) चेअरमन, राज्य स्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र,पुणे.
१०) विभागीय आयुक्त, (सर्व)
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व)
१७) निवडनस्ती